**राज्य माहिती आयोग, नाशिक खंडपीठ**
**कार्यालयातील प्रतिनियुक्तीस मुदतवाढ**
**देण्याबाबत.**
**श्री.तु.सु.शिंदे, सहायक कक्ष अधिकारी.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी-१५१७/प्र.क्र.१३७ (भाग-१) /१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २० ऑक्टोबर, २०२१

**संदर्भ:-** १) एएससी-१५१७/प्र.क्र.१३७/१४-अ, दिनांक २८-०८-२०१७ चे रोजीचे शासन आदेश
२) एएससी-१५१७/प्र.क्र.१३७ /१४-अ, दिनांक २९-०८-२०१९ चे रोजीचे शासन आदेश
३) राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक यांचे क्र.रामाआ-२०१७/प्र.क्र.३३/कार्या-२, दिनांक ०८-०९-२०२१ चे पत्र.

## शासन आदेश

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक २८-०८-२०१७ च्या आदेशान्वये श्री.तु.सु.शिंदे, सहायक कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांच्या सेवा २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने राज्य माहिती आयोग, नाशिक खंडपीठ, नाशिक या कार्यालयात उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. त्यानुसार श्री. शिंदे हे दिनांक ०८-०९-२०१७ पासून राज्य माहिती आयोग, नाशिक खंडपीठ येथे प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. त्यांचा प्रतिनियुक्तीचा २ वर्षाचा कालावधी दिनांक ०७-०९-२०१९ रोजी पूर्ण झाल्यानंतर संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक २९-०८-२०१९ च्या आदेशान्वये त्यांच्या प्रतिनियुक्तीस पुढील २ वर्षासाठी दिनांक ०८-०९-२०१९ ते ०७-०९-२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. श्री. शिंदे यांचा एकूण ४ वर्षाचा प्रतिनियुक्ती कालावधी दिनांक ०७-०९-२०२१ रोजी संपुष्टात आला आहे.

२. राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक यांनी संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक ०८-०९-२०२१ च्या पत्रान्वये त्यांचे शारीरिक कारण, कौटुंबिक कारण व प्रशासकीय कारण नमूद करुन त्यांच्या प्रतिनियुक्तीस १ वर्ष मुदतवाढ देण्याबाबत शिफारस केली आहे.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दिनांक १६.०२.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अटी व शर्ती आणि नियुक्तीची कार्यपध्दती याबाबतच्या धोरणामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

परि.क्र. ५(अ) (३) :- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा. परंतु चार वर्षांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर आणखी एक वर्षासाठी म्हणजेच ५ व्या वर्षासाठी मुदतवाढ द्यावयाची झाल्यास मा. मुख्यमंत्री यांची विनिर्दिष्टपणे मान्यता घेण्यात यावी. ५ वर्षाचा कालावधी संपल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत मुदतवाढ अनुज्ञेय राहणार नाही.

४. वर परिच्छेद ३ मधील शासन निर्णयातील तरतुदीनुसार ५ व्या वर्षी श्री. शिंदे यांच्या प्रतिनियुक्तीस १ वर्षासाठी मुदतवाढ देण्याबाबतची विनंती शासन स्तरावर मान्य करण्यात आली आहे. या आदेशान्वये श्री. शिंदे यांच्या प्रतिनियुक्तीस **दिनांक ०१-०८-२०२१ ते दिनांक ३१-०७-२०२२ पर्यंत एक वर्ष मुदतवाढ** देण्यात येत आहे.

५. प्रतिनियुक्ती संदर्भात सर्व अटी व शर्ती सामान्य प्रशासन विभाग आदेश क्र. एएससी-१५१७/ प्र.क्र.१३७/१४-अ, दिनांक २८-०८-२०१७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे असतील. त्यांच्या या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ अंतिम स्वरुपाची असून, त्यांना या पुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पुन्हा राज्य माहिती आयोग, नाशिक खंडपीठ यांनी या विभागाकडे सादर करु नये. दिनांक ३१-०७-२०२२ रोजी प्रतिनियुक्तीचा मुदतवाढीचा कालावधी समाप्त होताच त्यांच्या सेवा त्यांच्या मुळ विभागास परत कराव्यात.

६. श्री.तु.सु. शिंदे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या अन्य प्रशासकीय बाबी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग व सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन- ६ यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

७. प्रतिनियुक्ती ही संबंधित कर्मचाऱ्याची व प्रतिनियुक्तीवरील कार्यालयाची तात्पुरती व्यवस्था असून संबंधित कर्मचाऱ्याची प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्यात आल्यामुळे तो कार्यरत असलेल्या विभागात त्या कर्मचाऱ्याची कमतरता रिक्त पदांअभावी नेहमी जाणवते प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील कार्यालयाने, त्याची सेवा त्याच्या मूळ विभागास सदरहू कर्मचाऱ्याचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होताच प्रत्यावर्तित करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२०१७०६२८८२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.10.20 17:07:41 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित कर्मचारी (राज्य माहिती आयोग, नाशिक खंडपीठ, नाशिक **कार्यालयामार्फत**)

**प्रत,**

१. सचिव, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, १३ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२
२. उप सचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ नाशिक, पिनॅकल मॉल, चौथा मजला, त्र्यंबकनाका सिग्नल जवळ, जुना आग्रा रोड, नाशिक-४२२ ००२.
३. सह/उप सचिव (आस्थापना), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग , मंत्रालय, मुंबई-४०००३२
४. उप सचिव, (कार्यासन ६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
५. निवडनस्ती (सा.प्र.वि-का.१४-अ).